



# पुस्तक खिडकी

ज्ञान

आनंद

भावना

कल्पना

सर्वांना पुस्तकांबद्दल प्रेम वाटावे, लोकांनी वाचते व्हावे, इतरांना वाचते करण्यासाठी प्रयत्न करावेत यासाठी 23 एप्रिलला “जागतिक पुस्तक दिवस” साजरा केला जातो.

मुलांना आणि मोठ्यांनाही वाचनाची आवड लावण्याचे प्रयत्न करणाऱ्या “पुस्तक खिडकी” मधून आज पुस्तकांच्या गोष्टी पाहू!






## ऐकू या

# आलफ्रेड जेक्टर - पुस्तक प्रेमी

आलफ्रेड जेक्टरला एकाच गोष्टीने आनंद व्हायचा - पुस्तके जमा करून! शहरातील सर्व पुस्तके आपल्याकडे असली पाहिजेत असे ठरवून त्याने आपले घर पुस्तकांनी खचाखच भरून टाकले. गावातल्या लोकांकडे वाचायला एकही पुस्तक उरले नाही! शेवटी आलफ्रेडला पुस्तकांचा खरा आनंद समजला. कसा? त्यासाठी ही गोष्ट ऐका! ऐकण्यासाठी चित्रावर क्लिक करा.

## वाचू या

# एक पुस्तक, पुचकूसाठी

पुचकूची सगळी पुस्तकं वाचून संपलेली आहेत. लायब्ररीतल्या कपाटाच्या सगळ्यात वरच्या कप्प्यात तिला आणखी पुस्तकं सापडतात. पण पुचकू तर आहे टिल्लू आणि कपाट आहे खूप खूप उंच! आपली आवडती पुस्तकं अखेर तिच्या हाती लागतील का? वाचण्यासाठी चित्रावर क्लिक करा.





jidnyasakids@gmail.com





# पुस्तकाचे मुखपृष्ठ तयार करू

आजच्या अंकातील आलफ्रेड जेक्टरची गोष्ट ऐकली का? ऐकताना तुझ्या डोळ्यासमोर आलफ्रेड नक्की आला असेल. त्याच्या घराचे, गावाचे, लोकांचे वर्णन ऐकून त्यांची चित्रे तुझ्या मनात उमटली असतील. गोष्टीच्या शेवटी आलफ्रेडला जेव्हा काही साक्षात्कार होतो तेव्हाचा त्याचा चेहेरा तुला दिसला असेल, हो ना?

**या गोष्टीचे पुस्तक छापायचे झाले तर त्याचे कव्हर, म्हणजे मुखपृष्ठ कसे दिसेल? त्यावर कसली कसली चित्र असायला हवीत असे तुला वाटते? याचा विचार कर, आणि या पुस्तकासाठी मुखपृष्ठ तयार कर! ते तुला छान वाटेल असे रंगव, त्यावर गोष्टीचे नाव लिही. आणि हो! त्याचा फोटो मात्र आम्हाला पाठवायला विसरू नकोस!**

आलफ्रेड जेक्टर
पुस्तक प्रेमी
???



jidnyasakids@gmail.com





# कविता पुस्तक नात्याच्या...

पुस्तकांमुळेच मानवी जीवन अधिक अर्थपूर्ण झालं. पुस्तकांमधूनच माणसाचे माणूसपण आकाराला आले. अमानवी प्रवृत्तींना पुस्तके नेहमीच शत्रू वाटत आली आहेत. शत्रूचा नायनाट करताना त्याने निर्माण केलेल्या पुस्तकांना नष्ट करण्याकडे अशा प्रवृत्तींचा कल जगभर दिसतो आहे.
अर्थात पुस्तकांना नष्ट करणारे हात जसे आजुबाजूला आहेत, तसेच पुस्तकांचे रक्षण करणारे लोकही आपल्या सभोवताली आहेत. प्राणांवर उदार होऊन त्यांनी पुस्तके जतन केली आहेत, जोपासली आहेत. भारतीय कवींनी पुस्तकांचे श्रेष्ठत्व सांगणाऱ्या कित्येक कविता लिहिल्या आहेत. सफदर हाश्मी, गुलजार, सतीश काळसेकर, किशोर पाठक अशा आणि अशा मान्यवरांच्या पुस्तकांवरील कविता मराठी वाचकांना ज्ञात आहेत. हिंदी, पंजाबी, नेपाळी भाषेतील पुस्तकांविषयीच्या या काही कविता पुस्तकांविषयीचे आपले आकलन विस्तारण्यास साहाय्यभूत ठराव्या अशा आहेत.
इतरही काही कविता HTTPS://DIVYAMARATHI.BHASKAR.COM/NEWS/MAG-DR-5415163-NOR.HTML येथे उपलब्ध आहेत.

## पुस्तक आणि सुरी

- नरेश जैन (हिंदी)

एक पुस्तक कसं रुपांतरीत होतं सुरीमध्ये
आणि उतरत जातं खोल खोल आत, आतड्यात?
एक सुरी कशी परावर्तीत होते पुस्तकात
आणि उतरत जाते मेंदूच्या नसानसांत?
कोणतं पुस्तक सुरीच्या विरोधात आपली पानं फडकवतं?
कोणती सुरी पुस्तकाची पानं फाडण्यासाठी उतावीळ होते?
कोण सांगणार हे सगळं तुला?
कोण वाचवणार तुला या पुस्तकापासून?
त्या सुरीपासून?
कुणापासून शिकणार आहेस तू?

पुस्तकापासून की सुरीपासून?

## पुस्तक जाळणारे

- जीवन नामदुंग (नेपाळी)

पुस्तक जाळणाऱ्यांची
खूप भीती वाटते मला
पुस्तकाच्या नावाखाली ते
आपलाच इतिहास जाळत असतात
आपली माती आणि आपलं सत्य जाळत असतात

विश्वयुद्धाची घोषणा करणाऱ्यांची मला भीती वाटत नाही
विमान हल्ले करणाऱ्यांशी मला घेणे देणे नाही
पण पुस्तक जाळणारांना खूप भिऊन असतो मी
पुस्तक जाळून थंडी पळवून लावणारे आजूबाजूलाच आहेत माझ्या
माझ्या शेजारी राहतात कागदाच्या नावेवर स्वार होऊन
आगीचा समुद्र ओलांडणारे लोक

भूसुरुंग पेरणारांची मला भीती वाटत नाही
काटेरी मुकुट घालणारांची भीती वाटत नाही
टोकदार कुंपण बनवणारांविषयी माझी तक्रार नाही
पण पुस्तक जाळणारांबद्दल मला काळजी वाटते
पुस्तकांच्या नावाखाली
ते एक देश जाळत असतात
सभ्यतेचे संस्कृतीचे शिल्लक अवशेष जाळत असतात.


jidnyasakids@gmail.com